सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांच्या वेतन व सरपंच,उपसरपंच यांचे मानधन व सदस्य बैठक भत्ता तसेच ग्रामपंचायत कर्मचारी भविष्य निर्वाह निधी शासन सहायक अनुदान हिस्सा वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः व्हीपीएम २०२४/प्र.क्र. १०२/पंरा-३**
**बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ फोर्ट, मुंबई - ४०० ००१.**
**तारीख: १३ फेब्रुवारी, २०२५.**

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०१७/प्र.क्र.२७/पंरा-३, दि.६.१.२०१८.
२) शासन परिपत्रक क्र. अर्थसंकल्प - २०२४/प्र. क्र.३४/अर्थ-३ दि.०१.०४.२०२४.
३) शासन ज्ञापन क्रमांक व्हीपीएम-२०२४/प्र.क्र.१०२/पंरा-३, दि.१४.५.२०२४.
४) शासन पत्र क्रमांक व्हीपीएम-२०२४/प्र.क्र.१०२/पंरा-३, दि.१.८.२०२४.
५) शासन ज्ञापन क्रमांक व्हीपीएम-२०२४/प्र.क्र.१०२/पंरा-३, दि.०५.०९.२०२४.
६) शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०२४/प्र.क्र.१०२/पंरा-३, दि.२१.०९.२०२४.
७) शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०२४/प्र.क्र.१०२/पंरा-३, दि.११.१२.२०२४.
८) शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०२४/प्र.क्र.२५०/पंरा-३, दि.१०.०२ .२०२५.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक एल-२, प्रधानशीर्ष - २०५३ - जिल्हा प्रशासन - ०७ - मानधन व इतर भत्ते यासाठी अनुदाने - (०७) (०१) - ग्रामपंचायतीचे सरपंच, सदस्य यांचे मानधन व इतर भत्ते आणि कर्मचाऱ्यांचे किमान वेतन यासाठी अनुदाने (२०५३ १०४२) वेतनेतर, ३१ - सहायक अनुदाने अंतर्गत वित्त विभागाने मूळ अर्थसंकल्पीय तरतूद रु.६०९.४२ कोटी इतका मंजूर केला आहे. तद्नंतर ग्रामपंचायत कर्मचारी यांचे दि.१.९.२०२० ते ३१.३.२०२२ पर्यन्तची सुधारित किमान वेतनातील थकबाकी अदा करण्यासाठी पावसाळी अधिवेशनात रु.४००.०० कोटीची पुरवणी मागणी मंजूर केली. तसेच सरपंच व उपसरंपच यांच्या मानधनात शासन निर्णय दि.२४.०९.२०२४ अन्वये वाढ करण्यात आल्याने, हिवाळी अधिवेशनात **रु.१२८.२४ कोटींची** पुरवणी मागणी मंजूर केली आहे. त्यानुसार सन २०२४-२५ साठी एकूण **रु.११३७.६६ कोटी** इतका अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आला आहे. त्यापैकी वित्त विभागाने आतापर्यन्त **रु.६५०,९७,०८,०००/-** इतक्या निधी बीडीएस वर उपलब्ध करुन दिला असून सदर निधी संचालक राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे यांना खालीलप्रमाणे वितरीत करण्यात आला आहे.

| अ.क्र | शासन ज्ञापन दिनांक | वितरीत करण्यात आलेली निधी |
|---|---|---|
| १ | १४/०५/२०२४ | रु.२४३,७६,००,०००/- |
| २ | ०५/०९/२०२४ | रु.२००,००,००,०००/- |
| ३ | २१/१०/२०२४ | रु.६०,९५,००,०००/- |
| ४ | ११/१२/२०२४ | रु.१४६,२६,०८,०००/- |

२. आता वित्त विभागाने मूळ अर्थसंकल्पीय तरतूदीतील शिल्लक तसेच पावसाळी अधिवेशनातील पुरवणी मागणीमधील अवितरीत निधीतून माहे जानेवारी,२०२५ व त्यापुढील कालावधीतील ग्रामपंचायत कर्मचा-यांचे वेतन,सरपंच, उपसरपंच यांचे मानधन व सदस्य बैठक भत्ता तसेच ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे भविष्य निर्वाह निधी रक्कम अदा करण्यासाठी तसेच ग्रामपंचायत कर्मचारी यांचे १९ महिन्यांतील थकीत फरक अदा करण्यासाठी सहाय्यक अनुदान रक्कम **रु.३४६,२६,०८,०००/- (रुपये तीनशे शेहचाळीस कोटी सव्वीस लक्ष आठ हजार फक्त)** इतका वितरीत केला आहे. सदर निधी संचालक राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे यांना अर्थसंकल्पीय प्रणालीवर वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

३. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक एल-२, प्रधानशीर्ष - २०५३ - जिल्हा प्रशासन - ०७ - मानधन व इतर भत्ते यासाठी अनुदाने - (०७) (०१) - ग्रामपंचायतीचे सरपंच, सदस्य यांचे मानधन व इतर भत्ते आणि कर्मचाऱ्यांचे किमान वेतन यासाठी अनुदाने (२०५३ १०४२) वेतनेतर, ३१ - सहायक अनुदाने अंतर्गत जानेवारी,२०२५ व त्या पुढील कालावधीतील ग्रामपंचायत कर्मचा-यांचे वेतन,सरपंच, उपसरपंच यांचे मानधन व सदस्य बैठक भत्ता , ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे भविष्य निर्वाह निधी रक्कम अदा करण्यासाठी तसेच ग्रामपंचायत कर्मचारी यांचे १९ महिन्यांतील किमान वेतनातील थकीत फरक अदा करण्यासाठी सहाय्यक अनुदान रक्कम **रु.३४६,२६,०८,०००/- (रुपये तीनशे शेहचाळीस कोटी सव्वीस लक्ष आठ हजार फक्त)** इतका निधी वितरीत व खर्च करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**४.** या विभागाच्या शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०१७/प्र.क्र.२७/पंरा-३, दिनांक ६ जानेवारी, २०१८ अन्वये राज्यातील ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे किमान वेतन तसेच शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०१९/प्र.क्र.२५५/पंरा-३, दि. १४ ऑगस्ट, २०१९ अन्वये सरपंच, उपसरपंच यांचे मानधन व सदस्य बैठक भत्ता थेट त्यांच्या बँक खात्यात जमा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तथापी, सदर सहायक अनुदान अदा करण्यासाठी विकसित केलेल्या ERP प्रणाली सद्य:स्थितीत बंद असल्याने, सदर ERP प्रणाली पूर्वीप्रमाणे सुरळीत होईपर्यन्त , सहायक अनुदान जिल्हा परिषद यांना वितरीत करुन, जिल्हा परिषदेमार्फत संबधितंना अदा करण्यास संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे यांना संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये मान्यता देण्यात आली आहे.

५ . संदर्भ क्रमांक ८ येथील शासन निर्णयानुसार वरील रक्कम खर्च करण्यासठी संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे हे नियंत्रण अधिकारी तसेच उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे हे आहरण व सवितरण अधिकारी राहतील.

६. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी, उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे यांनी अर्थसंकल्पीय प्रणालीवर निधी प्राप्त झाल्यानंतर ज्या प्रयोजनार्थ निधी वितरीत करण्यात आला आहे, त्या प्रयोजनार्थ खर्च करावा. प्रथमता: ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे किमान वेतन, भविष्य निर्वाह निधी व सरपंच, उपसरपंच यांचे मानधन व सदस्य बैठक भत्ता अदा करुन झाल्यानंतर उर्वरित उपलब्ध रक्कमेतून ग्रामपंचायत कर्मचारी यांचे १९ महिन्यांचे किमान वेतनातील फरक अदा करावे. सदर निधी खर्च झाल्यानंतर त्याबाबतचे खर्चाचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करावे. तसेच सदर निधी पुर्ण खर्च झाल्याबाबत नियंत्रक अधिका-यांच्या प्रमाणपत्रासह पुढील निधी मागणीबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

७. उपरोक्त आर्थिक वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे आहरण व संवितरण अधिकारी यांनी तपासण्याच्या अधीन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच, वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करुन कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पुणे यांची राहील.

८. सदर खर्च मागणी क्रमांक एल-२, २०५३- जिल्हा प्रशासन (०७) मानधन व इतर भत्ते यासाठी अनुदाने (०७)(०१) ग्रामपंचायतीचे सरपंच, सदस्य यांचे मानधन व इतर भत्ते आणि कर्मचाऱ्यांचे किमान वेतन यासाठी अनुदान (अनिवार्य)-३१, सहायक अनुदाने (२०५३ १०४२) (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या अर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. सदर सहायक अनुदान (वेतनेतर) हे सशर्त स्वरुपाचे आहे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक UOR NO.३९.२०२५/EXP.१५, Date २२.०१.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या wwwmaharashtragov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक संकेतांक २०२५०२१३१५४०२८६५२० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे अदेशानुसार व नावाने,

VARSHA MUNJA BHAROSE

Digitally signed by VARSHA MUNJA BHAROSE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1BD844032884BBF2167BC99CD85325223ACEEF69D02BD455B7CA6972491623E0, cn=VARSHA MUNJA BHAROSE
Date: 2025.02.13 15:46:37 +05'30'

**( व. मुं. भरोसे )**

**सह सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**आहरण व संवितरण अधिकारी, उप संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे.**

**प्रत माहिती व योग्य त्या कार्यवाहीस्तव रवाना :-**

१) स्वीय सहायक, प्रधान सचिव (ग्राम विकास व पं.रा.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

२) सह सचिव/ उप सचिव (पंरा/आस्था/वित्त), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, महाराष्ट्र राज्य,पुणे.
४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर
६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
७) सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१० ) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
११) सर्व जिल्हा कोषागर अधिकारी
१२) कक्ष अधिकारी (कार्यासन अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१७/व्यय-१५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) कक्ष अधिकारी ( रोख शाखा , कार्यासन वित्त-१, वित्त-७ ), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासन-पंरा-३ संग्रहार्थ .